**महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्या आस्थापनेवर पोलीस उप निरीक्षकांची ६५ अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पोलीस-१८१९/प्र.क.१९४/पोल-५अ**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०२ मे,२०२४

**वाचा :-**

१) शासन निर्णय समक्रमांक दि.२८.१२.२०२३
२) अपर पोलीस महासंचालक (आस्थापना) पोलीस महासंचालक कार्यालय,मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं/५/१०/ससे पोउनि (मुख्य) परीक्षा -२०२०/१०२/२०२२, दि.१५.०३.२०२४
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२०.०२.२०१६

**प्रस्तावना:-**

पोलीस उपनिरीक्षक अराजपत्रित, गट-ब संवर्गातील ६५० पदांच्या भरतीकरीता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून परीक्षा घेण्यात आली पोलीस उपनिरीक्षक संवर्गाच्या एकूण ६५० पदांपैकी EWS प्रवर्गासाठी आरक्षित असलेल्या ६५ पदांचा निकाल राखून ठेवून उर्वरीत ५८५ पदांचा निकाल दि.१९.०७.२०२३ रोजी महाराष्ट्र लोक सेवा आयोगाने जाहीर केला. सदर निकालाच्या आधारे पोलीस उपनिरीक्षक संवर्गातील नियुक्तीकरीता शिफारसपात्र ठरलेल्या ५८३ उमेदवारांचे, महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजराजपत्रित, गट-ब (मुख्य) परीक्षा- २०१९ मधून उशिराने/प्रतिक्षायादी मधून शिफारस झालेल्या १६ उमेदवारांचे तसेच मागील प्रशिक्षण सत्रामध्ये मुदतवाढ घेतलेल्या २६ असे एकुण ६२५(५८३+१६+२६) उमेदवारांचे पोलीस उपनिरीक्षक पदाचे १२ महिन्यांचे प्रशिक्षण महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक येथे प्रशिक्षण सत्र क्र.१२४ मध्ये दि.२४.११.२०२३ पासून सुरु करण्यात आले. सदर प्रशिक्षाणार्थी पोलीस उपनिरीक्षकांचे वेतन व भत्ते अदा करण्याकरीता महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्या आस्थापनेवर पोलीस उपनिरीक्षकांची ६२५ अधिसंख्य पदे निर्माण करण्यास संदर्भ क्र.१ येथील दि.२८.१२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

मा. उच्च न्यायालय,मुंबई येथे दाखल रिट याचिका व इतर रिट याचिका प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दि.२२.१२.२०२३ रोजी अंतिम न्यायनिर्णय दिला असून मा. उच्च न्यायालयाच्या सदर न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटक प्रवर्गासाठी आरक्षित ६५ पदांसाठी प्रतिवादींनी वरिष्ठ न्यायालयात आव्हान दिल्यास त्यावरील आदेशाच्या अधीन राहून आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटक प्रवर्गाच्या ६५ उमेदवारांची महाराष्ट्र लोक सेवा आयोगाने शिफारस केली आहे. सदर ६५ उमेदवारांचे पोलीस उपनिरीक्षक पदाचे प्रशिक्षण दि.१५.०१.२०२४ पासून महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक येथे सुरु झाले आहे. सदर प्रशिक्षाणार्थी पोलीस उपनिरीक्षकांचे वेतन व भत्ते अदा करण्याकरीता महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्या आस्थापनेवर पोलीस उपनिरीक्षकांची ६५ अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजराजपत्रित, गट-ब (मुख्य) परीक्षा- २०२० मधून महाराष्ट्र लोक सेवा आयोगाने शिफारस केलेल्या ६५ प्रशिक्षणार्थी पोलीस उपनिरीक्षकांचे वेतन व भत्ते अदा करण्यासाठी महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्या आस्थापनेवर **दि.१५.०१.२०२४ ते दि.२३.११.२०२४** या कालावधीसाठी पोलीस उपनिरीक्षकांची ६५ अधिसंख्य पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर अधिसंख्य पदे विविध पोलीस घटकांमध्ये पोलीस उपनिरीक्षकांच्या रिक्त असलेल्या पदांच्या अधिनतेने निर्माण करण्यात आली असल्याने ही पोलीस उप निरीक्षकांची रिक्त पदे ज्या आस्थापनेवर आहेत त्या आस्थापनेवर वेतन काढले जाणार नाही याची खात्री करण्यात यावी.

३. याकरीता होणारा खर्च वित्तीय वर्ष सन २०२३-२४ व सन २०२४-२५ साठी “ मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस, १०९ जिल्हा पोलीस दल, (००) (०१) जिल्हा पोलीस बल” या लेखाशिर्षाखाली संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांना मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय संदर्भ क्र.२ येथील वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांक.पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५०२१७१६१५५२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINAYAK SADASHIV CHAVAN

Digitally signed by VINAYAK SADASHIV CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=3d6fb52eeb39bf3c4a0001ceaa97736aa6fb733903d657c4d7b6e66cdadfd6fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1DB7A03BD2B7B1CF5AFDC7A4A26DC14D44297AA2B63F7493C19351A3D51630D0, cn=VINAYAK SADASHIV CHAVAN
Date: 2024.05.02 17:28:35 +05'30'

**( विनायक चव्हाण )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अपर पोलीस महासंचालक (आस्थापना/प्रशासन), पोलीस महासंचालक कार्यालय,मुंबई
४. विशेष पोलीस महानिरीक्षक (आस्थापना), पोलीस महासंचालक कार्यालय,मुंबई
५. संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र -१, मुंबई
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
१०. निवडनस्ती (पोल-५अ)